पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील २५ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२० ते ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत मुदतवाढ देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** आस्था-२०१६/प्र.क्र.१०९/पापु-०१

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत, क्रॉफर्ड मार्केटजवळ,लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ०१

तारीख: २६ फेब्रुवारी, २०२०

**वाचा-**

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः** आस्था-२०१०/प्र.क्र.५९४/पापु-०१, दिनांक २२ मार्च, २०१२.

२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः** आस्था-२०१६/प्र.क्र.१०९/ पापु-०१, दिनांक ०५ ऑक्टोबर, २०१८.

३) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः** आस्था-२०१६/प्र.क्र.१०९/पापु-०१, दिनांक १० ऑक्टोबर, २०१९.

४) **शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः** पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२ फेब्रुवारी, २०२०.

**प्रस्तावना-**

उक्त वाचा मधील क्रमांक १ येथील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या दिनांक २२ मार्च, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागासाठी नव्याने निर्माण केलेल्या २५ अस्थायी पदांना, उक्त वाचा मधील क्रमांक ३ येथील दिनांक १० ऑक्टोबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१९ ते दिनांक २० फेब्रुवारी, २०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

०२. उक्त वाचा मधील क्रमांक ४ येथील वित्त विभागाच्या दिनांक १२ फेब्रुवारी, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये, सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२० ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. त्यानुषंगाने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील २५ अस्थायी पदांना पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय-

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत पिण्याचे स्वच्छ व शुध्द पाणी आणि स्वच्छतेच्या सुविधा उपलब्ध करावयाच्या अनुषंगाने, योजनांची अंमलबजावणी व त्यानुषंगाने येणारा वाढीव कार्यभार सक्षमपणे पेलण्यासाठी विभागाला अधिक मनुष्यबळाची आवश्यकता निर्माण झाली आहे. यास्तव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील २५ अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक आहे.

०२. सबब, वाचा मधील क्रमांक ४ येथील वित्त विभागाच्या दिनांक १२ फेब्रुवारी, २०१९ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार, या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील २५ अस्थायी पदांना, दिनांक ०१ मार्च, २०२० ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

०३. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील सदर २५ अस्थायी पदांवर होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-५, लेखाशीर्ष-३४५१- सेक्रेटरीएट आर्थिक सेवा-०९०-सेक्रेटरीएट (१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (३४५१ ०४६७) या लेखाशीर्षाखाली २०१९-२० या वित्तीय वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दिनांक १२ फेब्रुवारी, २०२० च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार, प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२६१२५३४९०८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deshmukh Varsha Gunvant

Digitally signed by Deshmukh Varsha Gunvant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=318374474bdbbee0a87fa98c6ce4add bc6f40c52596bc652c9c91f0a77a35550, serialNumber=b030780a012e3648cb356030f4d 4bfd6dcfed5e1526059a46c087a14fe3c29a0, cn=Deshmukh Varsha Gunvant
Date: 2020.02.26 14:33:43 +05'30'

**(वर्षा देशमुख)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

४. सह सचिव, वित्त विभाग (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
५. अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अवर सचिव/कार्यासन अधिकारी (पापु-०४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती (कार्यासन पापु-०१).

**प्रपत्र अ**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक, आस्था-२०१६/प्र.क्र.१०९/पापु-०१,
दिनांक २६ फेब्रुवारी, २०२० सोबतचे सहपत्र.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील अस्थायी पदे

| **अ. क्र.** | **पदनाम** | **वेतन बँड + ग्रेड पे. (६ वा वेतन आयोग)** | **पदसंख्या** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | उप सचिव | रु. १५६००-३९१०० + ७६०० | १ |
| २ | अवर सचिव | रु. १५६००-३९१०० + ६६०० | २ |
| ३ | कक्ष अधिकारी | रु. ९३००-३४८०० + ४८०० | ३ |
| ४ | सांख्यिकी अधिकारी | रु. ९३००-३४८०० + ४४०० | १ |
| ५ | लेखा अधिकारी | रु. ९३००-३४८०० + ४६०० | १ |
| ६ | उप अभियंता | रु. १५६००-३९१०० + ५४०० | ३ |
| ७ | उच्चश्रेणी लघुलेखक | रु. ९३००-३४८०० + ४४०० | १ |
| ८ | निम्नश्रेणी लघुलेखक | रु. ९३००-३४८०० + ४३०० | ३ |
| ९ | लघुटंकलेखक | रु. ५२००-२०२०० + २४०० | २ |
| १० | सहायक कक्ष अधिकारी | रु. ९३००-३४८०० + ४३०० | ४ |
| ११ | लिपिक-टंकलेखक | रु. ५२००-२०२०० + १९०० | ४ |
| | **एकुण पदे** | | **२५** |

Deshmukh Varsha Gunvant

Digitally signed by Deshmukh Varsha Gunvant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400001, st=Maharashtra,
2.5.4.20=318374474bdbbee0a87fa98c6ce4addbc6f40c52596bc652c9c91f0a77a35550,
serialNumber=b030780a012e3648cb356030f4d4bfd6dcfed5e1526059a46c087a14fe3c29a0,
cn=Deshmukh Varsha Gunvant
Date: 2020.02.26 14:34:27 +05'30'

**(वर्षा देशमुख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**